महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या
सेवानिवृत्त कर्मचा-यांना निवृत्तीवेतनाचे
लाभ मंजूर करण्यासाठी प्राधिकरणास
सहायक अनुदान (२२१५A०५२ )
३१, सहायक अनुदाने (वेतनेतर)

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांकः बजेट-१४२३/प्र.क्र.९८/पापु-२३

७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल
क्रॉफर्ड मार्केटजवळ, लोकमान्य टिळक मार्ग,
नवीन मंत्रालय, मुंबई ४०० ००१
तारीख: २६ मार्च, २०२४

**वाचा :-**

१) शासन निर्णय, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांकः मजीप्रा-२०१४/प्र.क्र.३३(अ)/पापु-२३, दिनांक २३.०३.२०१७.
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांकः अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि. १२ एप्रिल,२०२३
३) शासन निर्णय ,पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांकः बजेट-१४२३/प्र.क्र.९८/पापु-२३, दिनांक २५.०७.२०२३
४) शासन निर्णय ,पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांकः बजेट-१४२३/प्र.क्र.९८/पापु-२३, दिनांक २६.१०.२०२३
५) शासन निर्णय ,पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांकः बजेट-१४२३/प्र.क्र.९८/पापु-२३, दिनांक १८.१२.२०२३
६) शासन निर्णय ,पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांकः मजीप्रा-११२३/प्र.क्र.२१८/पापु-२३, दिनांक ०९.०२.२०२४

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या कर्मचा-यांच्या वेतन व भत्ते तसेच निवृत्तीवेतनाचे दायित्व शासनाने दिनांक २३.३.२०१७ च्या शासन निर्णयान्वये स्विकारले असून महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या सेवानिवृत्त कर्मचा-यांच्या निवृत्तीवेतनावरील खर्च अदा करण्यासाठी अनुदान म्हणून २२१५A०५२ या लेखाशिर्षाखाली वित्तीय वर्ष सन २०२३-२४ करिता रु.३५७.६३४४ कोटी इतकी अर्थसंकल्पिय (पुरवणी मागणीसह) तरतूद करण्यात आली होती. सदर लेखाशीर्षांतर्गत रु.३५७.६३४४ कोटी इतके सुधारीत अंदाज मंजूर करण्यात आले आहेत . महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातून सेवानिवृत्त झालेल्या कर्मचा-यांना सन २०२३-२४ या आर्थिक वर्षातील

निवृत्तीवेतनाचे लाभ अदा करण्यासाठी वाचा येथील अनुक्रमांक (३) ते (६)अन्वये प्राधिकरणास एकूण रु.३३६,४७,७२,०००/- इतके अनुदान वितरीत करण्यात आले आहे. आता सदर लेखाशिर्षांतर्गत सुधारीत अंदाजाच्या मर्यादेत निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

## शासन निर्णय :-

महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातून सेवानिवृत्त झालेल्या कर्मचा-यांना सन २०२३-२४ या आर्थिक वर्षातील निवृत्तीवेतनाचे लाभ अदा करण्यासाठी “मागणी क्रमांक वाय-२, २२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता १९९, इतर अशासकीय संस्थांना सहाय्य (०१) इतर अशासकीय संस्थांना सहाय्य (०१)(०१) महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडे वर्ग झालेल्या शासकीय कर्मचा-यांना निवृत्तीवेतनाचे लाभ मंजूर करण्यासाठी सहायक अनुदान (अनिवार्य) (२२१५ A०५२) ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर)” या लेखाशिर्षाखाली रुपये २१,१५,७२,०००/- (अक्षरी रूपये एकवीस कोटी पंधरा लाख बाहत्तर हजार फक्त) इतके अनुदान प्राधिकरणास पुढील अटींच्या अधीन राहून मुक्त करण्यात येत आहे.

i) या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येणारे अनुदान महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील सेवानिवृत्त अधिकारी/कर्मचारी यांच्या सन २०२३-२४ मधील निवृत्तीवेतन लाभांसाठी मंजूर असल्याने या अनुदानामधील रकमेचा खर्च त्याच कामांसाठी होईल याची दक्षता सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांनी घ्यावी. पूर्वीच्या थकीत सेवानिवृत्तीवेतन लाभासाठी या निधीचा वापर करु नये.

ii) या निधीचा अन्य बाबींवरील खर्च (विनियोग) ही वित्तीय अनियमितता समजण्यात येईल व अशा कृतीसाठी संबंधित अधिकारी/कर्मचारी शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र राहतील.

iii) मुक्त अनुदानाच्या रकमेचे स्वतंत्र लेखे ठेवण्यात यावेत.

iv) मुक्त अनुदानातून होणा-या वाटपाची माहिती प्राधिकरणाने वेळोवेळी शासनास कळवावी.

v) "३१- सहायक अनुदाने (वेतनेतर)" या उद्दिष्टांतर्गत वितरीत करण्यात येत असलेले अनुदान वित्त विभागाच्या दिनांक १२.०१.२०२३ च्या शासन निर्णयानुसार “सशर्त” स्वरुपाचे आहे. प्राधिकरणाने मुक्त अनुदानाचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनाला सादर करावे. संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांनी उपयोगिता प्रमाणपत्रात दर्शविलेल्या मंजूर व मुक्त अनुदानाच्या रकमा तसेच खर्चाच्या रकमा प्रमाणित कराव्यात. त्या उपयोगिता प्रमाणपत्रांवर सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांनी प्रतिस्वाक्षरी करावी. अशी उपयोगिता प्रमाणपत्रेच शासनाला स्विकारार्ह होतील.

vi) मुक्त केलेल्या अनुदानाच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाचा ताळमेळ घालावा आणि विहित अहवाल, विहित दिनांकास लेखा अधिकारी, पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचेकडे सादर करावा.

vii) कोणत्याही सेवानिवृत्त कर्मचा-यांचे निवृत्तीविषयक लाभ दीर्घकाळ प्रलंबित राहणार नाहीत, याची प्राधिकरणाने दक्षता घ्यावी. तसेच सेवानिवृत्त कर्मचा-यांचे सेवानिवृत्तीवेतन विषयक लाभ अदा करताना जुनी प्रकरणे प्राथम्याने निकाली काढावीत. सेवानिवृत्त अधिकारी/ कर्मचारी यांची कालानुक्रमे यादी तयार करुन त्याआधारे प्राथम्यक्रमाने

निवृत्तीवेतन विषयक लाभ अदा करण्याची कार्यवाही करावी. त्याप्रमाणे कार्यवाही होत असल्याचे प्रमाणपत्र पुढील निधीची मागणी करताना शासनास सादर करावे.

viii) एक वर्षाहून अधिक कालावधीसाठी सेवानिवृत्ती उपदान व अंशराशीकरण प्रलंबित असलेल्या कर्मचाऱ्यांची सविस्तर यादी पुढील निधीची मागणी करताना शासनास सादर करावी.

ix) डिसेंबर २०२३ ते फेब्रुवारी २०२४ अखेर प्राधिकरणाकडे जमा झालेले तांत्रिक शुल्क व ईटीपी चार्जेस शासनाकडे त्वरीत जमा करावेत. तसेच मार्च २०२४ अखेर जमा होणाऱ्या रक्कमा चालू वित्तीय वर्षातच जमा कराव्यात

२. या शासन निर्णयान्वये वितरीत केलेले अनुदान प्राप्त करुन घेण्यासाठी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे संचालक (वित्त), श्री.राजेंद्र मडके, यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून तर श्री. रा.म. गेंगजे, उप सचिव, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. शासनाद्वारे देण्यात येणारे निवृत्तीवेतन अनुदान लाभार्थ्यांच्या बँक अकाऊंटमध्ये ECS द्वारे प्रदान करणे बंधनकारक राहील. कोणत्याही परिस्थितीत निवृत्तीवेतन अनुदानाची रक्कम एकत्रितरित्या व Offline पद्धतीने वितरीत करण्यात येऊ नये.

४. प्रस्तुत प्रकरणी होणारा खर्च "मागणी क्रमांक वाय-२, २२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता १९९, इतर अशासकीय संस्थांना सहाय्य, (०१) इतर अशासकीय संस्थांना सहाय्य, (०१)(०१) महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडे वर्ग झालेल्या शासकीय कर्मचा-यांना निवृत्तीवेतनाचे लाभ मंजूर करण्यासाठी सहायक अनुदान (अनिवार्य) (२२१५A०५२) ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकून सन २०२३-२४ मधील वित्तीय लेख्यात समाविष्ट करावा.

५. वित्त विभाग, अनौपचारिक संदर्भ क्रमांक ११९ /व्यय-३, दिनांक २८.०२.२०२४ अन्वये प्राप्त सहमतीनुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३२६१०५२२६६०२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

BALASAHEB B HAJARE

Digitally signed by BALASAHEB B HAJARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=49ad4eefa4101394c1b1119b5f2d93940a592bd8a91d2970b24702e05968e19f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=0EDD9C3872935C071332E1F94CBCDC9828471B3251EEE2D5C23FD681EC41CEFA, cn=BALASAHEB B HAJARE
Date: 2024.03.26 11:56:00 +05'30'

**(बाळासाहेब बा. हजारे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा. विधानसभा / विधान परिषद सदस्य, सर्व

२. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
३. संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, नवी मुंबई
४. महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई (लेखा व अनुज्ञेयता)
५. महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई (लेखा परिक्षा)
६. महालेखापाल, महाराष्ट्र-२ नागपूर (लेखा व अनुज्ञेयता)
७. महालेखापाल, महाराष्ट्र-२ नागपूर (लेखा परिक्षा)
८. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
९. अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, वांद्रे, मुंबई
१०. कक्ष अधिकारी, वित्त विभाग, (व्यय-३ व अर्थसंकल्प-१८)
११. कार्यासन पापु-०४ व पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
१२. निवड नस्ती कार्यासन पापु-२३